**गडचिरोली जिल्ह्यात नक्षली हल्ल्यात बळी पडलेल्या मृतकांच्या वारसांना व कायमस्वरुपी अपंगत्व प्राप्त झालेल्या व्यक्तीस केंद्रीय अर्थसहाय्य मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

महसूल व वन विभाग,

शासन निर्णय क्र. आरएलएफ-२०१४/प्र.क्र.२८०/म-३

मंत्रालय,मुंबई-४०००३२.

दिनांक : ३१ऑक्टोबर, २०१४

वाचा :- १) केंद्र शासनाचे पत्र क्र.११०४४/११/२०११ व्हीटीव्ही, दि.२९ जून, २०१२

२) गृह विभाग, शासन निर्णय क्र.एनएएक्स १२१२/प्र.क्र.५०१/विशा-१ ब, दि. २१ एप्रिल २०१४ ,

३) जिल्हाधिकारी, गडचिरोली यांचे पत्र क्र. कार्या-२/अका-टंचाई/कावि/ ७६९/२०१४, दि.९ जुलै, २०१४

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने संदर्भाधीन दि.२९ जून, २०१२ च्या पत्रान्वये नक्षल हल्ल्यात बळी पडलेल्या मृतकांच्या वारसांना तसेच कायमस्वरुपी अपंगत्व प्राप्त झालेल्या व्यक्तीस प्रत्येकी रु.३ लाख इतकी मदत देण्याचे घोषित केले आहे. सदर रक्कम प्रथम राज्य शासनाकडून अदा करण्यात येऊन त्याची प्रतिपूर्ती केंद्र शासनाकडून करण्यात येणार आहे. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार जिल्हाधिकारी, गडचिरोली यांनी त्यांच्या जिल्ह्यात नक्षलवादी हल्ल्यात बळी पडलेल्या मृत व्यक्तींच्या प्रस्तावांची छाननी करुन, दि.१७ जून, २०१४ च्या बैठकीमध्ये एकूण ५७ प्रस्तावांना मंजूरी दिली आहे. त्यानुसार जिल्हाधिकारी, गडचिरोली यांनी नक्षल हल्ल्यात बळी पडलेल्या ५७ मृत व्यक्तींच्या वारसांना / कायम अपंगत्व आलेल्या व्यक्तींना प्रत्येकी रु.३ लाख याप्रमाणे एकूण रु.१.७१ कोटी इतक्या निधीची मागणी शासनाकडे केली होती. त्यास अनुसरुन जिल्हाधिकारी, गडचिरोली यांना सदर निधी देण्याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे .

**शासन निर्णय**

गडचिरोली जिल्ह्यात नक्षलवादी हल्ल्यात बळी पडलेल्या ५६ मृत व्यक्तींच्या वारसांना व कायमस्वरुपी अपंगत्व प्राप्त झालेल्या एका व्यक्तीस अशा एकूण ५७ प्रकरणांमध्ये केंद्र शासनाच्या योजनेनुसार प्रत्येकी रु.३ लाख याप्रमाणे एकूण रु.१.७१ कोटी (अक्षरी रुपये एक कोटी एकाहत्तर लक्ष फक्त) इतका निधी जिल्हाधिकारी, गडचिरोली यांना उपलब्ध करुन देण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. जिल्हाधिकारी, गडचिरोली यांना खालील लेखाशीर्षांतर्गत रु.१.७१ कोटी (अक्षरी रुपये एक कोटी एकाहत्तर लक्ष फक्त) इतका निधी आकस्मिकता निधी अग्रीमाव्दारे प्राप्त निधीमधून उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

मागणी क्रमांक : सी-५

२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण
६० इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम
२००- इतर कार्यक्रम
(०१) दंगलग्रस्त भागातील झळ पोहोचलेल्या व्यक्तींना सहाय्य
(०१) (०६) नक्षलवादी हल्ल्यात झळ पोहोचलेल्या व्यक्तींना सहाय्य
(२२३५ बी३७२) (दत्तमत)
३१-सहायक अनुदाने (योजनेतर)

३. सदर निधी अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) वर जिल्हाधिकारी, गडचिरोली यांचेकडे सुपूर्द करण्यात येत आहे. सदर निधीचे वितरण केंद्र शासनाच्या सूचनांनुसार संबंधित बाधितांच्या वारसांना करण्यात यावी. सदर निधीचे वितरण तातडीने करण्यात येऊन करण्यात आलेल्या कार्यवाहीची माहिती सचिव, मदत व पुनर्वसन यांचेकडे सादर करावी.

४. जिल्हाधिकारी, गडचिरोली यांनी आकस्मिकता निधीमधून खर्च करण्याकरिता आहरण व संवितरण अधिका-याकडे सुपूर्द करण्यासंबंधीच्या आदेशात / पत्रात आगाऊ रकमेतून खर्च करताना सादर करण्यात येणा-या देयकावर आकस्मिकता निधी अग्रीम शासन ज्ञापन, वित्त विभाग, क्र.आकनि-२०१४/४/अर्थसंकल्प-६, दि.३० ऑक्टोबर, २०१४ अन्वये मंजूर असे लाल शाईने लिहावे, अशी स्पष्ट सूचना त्या आदेशात / पत्रात अंतर्भूत करावीत व ही सूचना लाल शाईने अधोरेखित करावीत. तसेच देयक कोषागारात सादर करताना त्यावर लाल शाईने सदर खर्च आकस्मिकता निधीमधून करण्यात आला आहे, अशी नोंद घेण्यात यावी. सदर प्रकरणी पूरक अनुदान प्राप्त झाल्यावर तो "मागणी क्र. सी-५, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६० इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, २००- इतर कार्यक्रम, (०१) दंगलग्रस्त भागातील झळ पोहोचलेल्या व्यक्तींना सहाय्य, (०१) (०६) नक्षलवादी हल्ल्यात झळ पोहोचलेल्या व्यक्तींना सहाय्य, (२२३५ बी३७२) (दत्तमत), ३१-सहायक अनुदाने (योजनेतर)" या लेखाशीर्षाखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा. याकरिता आकस्मिकता निधी संकेतांक (८००० ६९१६) असा आहे.

५. केंद्र शासनाच्या संदर्भाधीन पत्रानुसार सदर मदत बाधितांच्या वारसांना देण्याची कार्यवाही तात्काळ करण्यात यावी. तसेच केंद्र शासनाकडून सदर रकमेची प्रतिपूर्ती करण्याबाबत संदर्भाधीन दि.२९ जून, २०१२ मध्ये देण्यात आलेल्या सूचनेनुसार आवश्यक ती कार्यवाही जिल्हाधिकारी, गडचिरोली यांनी तात्काळ करावी.

६. सदर निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेखे / नोंदवह्या विहीत कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत करणा-या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्याच्या सूचना देण्यात याव्यात. तसेच कोणत्याही परिस्थितीत या अग्रीम निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च होणार नाही व हा खर्च दिनांक १ डिसेंबर, २०१४ पूर्वी करण्यात येईल याची दक्षता नियंत्रण अधिकारी यांनी घ्यावी. वर्षअखेरीस संपूर्णपणे प्रमाणित विनियोजन लेखे या विभागाकडे सादर करण्याची दक्षताही नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी.

७. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक५६३/२०१४/व्यय-९, दि.२८/१०/२०१४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४११०३१०४३०१६६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Rajaram Jagtap

Digitally signed by Ashok Rajaram Jagtap
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ashok Rajaram Jagtap
Date: 2014.11.03 16:38:19 +05'30'

( अ.रा.जगताप )
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,

१) विभागीय आयुक्त,नागपूर विभाग, नागपूर
२) जिल्हाधिकारी,गडचिरोली
३) जिल्हा कोषागार अधिकारी,गडचिरोली
४) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर
५) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर
६) वित्त विभाग (अर्थसंकल्प-३/अर्थसंकल्प-४/अर्थसंकल्प-६/व्यय-९),मंत्रालय,मुंबई
७) कक्ष अधिकारी,ब-१/पीएसी/पीएसी-१कार्यासने/म-११,म.व व.वि.,मंत्रालय,मुंबई-३२
८) निवडनस्ती (म-३कार्यासन) महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई ३२

**प्रत माहितीसाठी**

१) मुख्य सचिव यांचे विशेष कार्यकारी अधिकारी,
२) अप्पर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
३) सचिव (म.व पु.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४) संचालक व सचिव (आपत्ती व्यवस्थापन प्रभाग), मंत्रालय, मुंबई

*******